निवडसुची वर्ष २०२४-२५ मध्ये अपर जिल्हाधिकारी संवर्गातील पात्र अधिकाऱ्यांना अपर जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील नियमित पदोन्नती कोटयातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती व पदस्थापना देणेबाबत.......

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन आदेश क्र.पदोन्नती-२०२५/प्र.क्र.१०/ई-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक - २५ फेब्रुवारी, २०२५.

**संदर्भ :-**

१. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र.एसएनटी-२०२०/प्र.क्र.९७/ई-१ अ, दि. ३१.१२.२०२०
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दि.०७.०५.२०२१
३. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८१/बारा, दि. २१.०६.२०२१
४. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र.एसएनटी-२०१७/प्र.क्र.२१/ई-१ अ, दि.०५.०७.२०२१
५. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या.१२, दि. १४.०७.२०२१
६. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र.एसएनटी-२०२१/प्र.क्र.५२/ई-१ अ, दि. ०५.०८.२०२१
७. सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग यांचे पत्र क्र. ईएसबी-११२५/प्रक्र १६/आस्थामं (का-१३), दिनांक १७.०२.२०२५.

**शासन आदेश :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ७ येथील दिनांक १७.०२.२०२५ रोजीच्या इतिवृत्तान्वये, आस्थापना मंडळ (क्रमांक २) यांनी अपर जिल्हाधिकारी संवर्गातील अधिका-यांची अपर जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) या पदोन्नतीच्या पदाकरीता पात्रता तपासून निवडसूची वर्ष २०२४-२०२५ मध्ये अपर जिल्हाधिकारी (गट-अ) (वेतनश्रेणी एस २५-₹ ७८,८००- २,०९,२००/-) या संवर्गातील पात्र अधिकाऱ्यांना अपर जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) (गट-अ) (वेतनश्रेणी एस २७-₹ १,२३,१००- २,१५,९००/-) या संवर्गात नियमित पदोन्नती कोटयातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्याबाबत शिफारस करण्यात आलेली आहे.

२. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या.१२, दि.१४ जुलै, २०२१ अन्वये "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूल विभाग वाटप नियम, २०२१" निर्गमित झाली असून सदर

अधिसूचनेतील परिच्छेद क्र.२(२)(ग) अन्वये अतिरिक्त जिल्हाधिकारी व अतिरिक्त जिल्हाधिकारी (निवड श्रेणी) या संवर्गाला महसूली संवर्ग वाटप नियमावली लागू होत नाही.

३. सबब, आस्थापना मंडळाच्या शिफारशींनुसार व महसुल संवर्ग वाटप नियमावलीमधील परिच्छेद क्र. २(२)(ग) नुसार, पुढील अधिकाऱ्यांना प्रशासकीय निकड म्हणून सार्वजनिक सेवेच्या / लोकहितास्तव सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेनंतर त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे, अपर जिल्हाधिकारी (निवड श्रेणी) (गट-अ) (वेतनश्रेणी एस २७-₹ १,२३,१००-२,१५,९००/-) या पदावर पदोन्नती कोटयातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे. :-

| अ.क्र. | अपर जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) या पदावर पदोन्नत अधिका-याचे नाव | अपर जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) या पदावर पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | श्री.गजानन धोंडीराम पाटील | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे |

४. उक्त अधिकाऱ्यांना अपर जिल्हाधिकारी (निवड श्रेणी) या संवर्गात खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे :-

१. सदर तात्पुरती पदोन्नती ही सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.०७.०५.२०२१ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ च्या स्थितीनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ व विशेष अनुमती याचिका क्र.२५१८१/२०१८ व त्यातील आय.ए.क्र.२५९०/२०१९ मध्ये होणा-या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

२. सदर तात्पुरती पदोन्नती ही मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०८७८/२०२१ यामधील आय.ए.(स्टॅम्प) क्र.१०९१०/२०२१ व १०९११/२०२१ तसेच रिट पिटीशन (स्टॅम्प) क्र.१०९०९/२०२१ मध्ये होणा-या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

३. सदर तात्पुरती पदोन्नती ही दिव्यांग आरक्षणासंदर्भात मा.उच्च न्यायालय,मुंबई येथे दाखल रिट याचिका क्र.स्टँप ६८१९/२०२१ व अन्य यांचिकांवर मा.उच्च न्यायालयाने वेळोवेळी दिलेल्या आदेशाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. सदर तात्पुरती पदोन्नती ही मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेले मूळ अर्ज क्र. २३६/२०२१ (श्री. सूर्यकृष्णमूर्ती कोतापल्ली विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर) व क्र.२३७/२०२१ (श्री. अजिंक्य पडवळ विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर), मुळ अर्ज क्र. १५२२/२०२४ (श्री. सूर्यकृष्णमूर्ती कोतापल्ली विरुध्द महाराष्ट्र शासन) व मा. उच्च न्यायालय,

मुंबई खंडपीठ, औरंगाबाद येथील रिट याचिका क्र. ५८२१/२०२३ या न्यायालयीन प्रकरणांमध्ये होणा-या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

५. सदर निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

६. सदर निव्वळ तात्पुरती पदोन्नती ही सेवा ज्येष्ठतासूचीसंदर्भात न्यायालयात प्रलंबित असलेल्या सर्व याचिकेतील न्यायाधिकरणाच्या अंतिम निर्णयास अधीन राहतील.

७. महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती)नियम, १९७९ मधील नियम ३२ मधील तरतुदीनुसार, अपर जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) या संवर्गात पदोन्नत झालेल्या अधिका-यांनी पदोन्नतीचे पद धारण केल्याच्या तारखेपासूनच त्यांना पदोन्नतीच्या पदाचे लाभ देय ठरणार आहेत. तसेच पदोन्नत पदाचा कार्यभार स्विकारल्याच्या दिनांकापासूनच (वेतनश्रेणी एस २७- ₹ १,२३,१००-२,१५,९००/-) ही वेतनश्रेणी लागू होईल.

८. सदर तात्पुरती पदोन्नती ही अपर जिल्हाधिकारी व अपर जिल्हाधिकारी (निवड श्रेणी) या संवर्गाच्या वित्त विभागाच्या मान्यतेने मंजूर होणाऱ्या सुधारित आकृतीबंध निश्चितीच्या अधीन राहतील.

९. पदोन्नतीनंतर प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होणा-या अधिका-यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.१७.१२.२०१६ व शासन निर्णय दिनांक १६.०२.२०१८ मधील प्रतिनियुक्तीच्या धोरणातील विहित अटी व शर्ती लागू राहतील.

१०. उपरोक्त पदोन्नत अधिकाऱ्यांनी शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली २०२१, दिनांक २१.०६.२०२१ मधील २ (१) (ड) (१) मधील तरतुदीनुसार पदोन्नतीने नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्यानंतर ३० दिवसांचे आत पदोन्नतीच्या पदावर रुजू होणे आवश्यक आहे, अन्यथा ते सेवा ज्येष्ठता गमावण्यास पात्र राहतील.

११. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ६३ (६) (३) मधील तरतुदनुसार पदोन्नत अधिकारी ३० दिवसांचे आत रूजू न झाल्यास सदरचे अधिकारी महाराष्ट्र नागरी सेवा ( शिस्त व अपिल) नियम १९७९ मधील तरतुदीनुसार शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र राहतील.

१२. उपरोक्त पदोन्नत अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, नवीन नियुक्तीच्या ठिकाणी रूजू झाल्याबाबतचा अहवाल e१.revenue@maharashtra.gov.in या ई-मेलव्दारे/टपालाव्दारे शासनास त्वरीत कळवावे.

१३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०२२५१४१६२४६११९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARUDKAR
MAHESH
ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department,
2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7ebbbc3712e8d459ef90bf7aae4ea46e9caebdd50cfecde2ee7ce0454fa0416a, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2025.02.25 14:17:28 +05'30'

**(महेश वरुडकर)**
**शासनाचे उप सचिव**

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
२. मा.उप मुख्यमंत्री (नगरविकास/गृहनिर्माण) महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३. मा.उप मुख्यमंत्री ((वित्त व नियोजन)) महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
५. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
७. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
८. अपर मुख्य सचिव गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
९. अपर मुख्य सचिव ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१०. अपर मुख्य सचिव (ऊर्जा) उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
११. अपर मुख्य सचिव (नवि-१/नवि-२), नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-०३२.
१२. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय,मुंबई ३२
१३. सचिव (उदयोग) उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई ३२
१४. सचिव (साविस), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई ३२
१५. सर्व विभागीय आयुक्त,महाराष्ट्र राज्य
१६. सर्व जिल्हाधिकारी
१७. महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर प्रशिक्षण व संशोधन संस्था, पुणे
१८. महासंचालक, महाऊर्जा विकास प्राधिकरण (महाऊर्जा), औंध रोड,पुणे ४११ ००७
१९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य शेती महामंडळ मर्यादित, पुणे
२०. आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे
२१. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (म्हाडा), मुंबई
२२. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२ मुंबई /नागपूर
२४. अधिदान व लेखा अधिकारी/निवासी लेखा अधिकारी, मुंबई
२५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२६. सर्व संबंधित अपर जिल्हाधिकारी निवडश्रेणी (विभागीय आयुक्तांमार्फत)
२७. सह सचिव (कार्यासन १३), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
२८. सह सचिव( कार्यासन १४ )सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई ३२
२९. सह सचिव( ल-७ )/(ई शाखा ) महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई ३२
३०. उप सचिव (ई-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३१. नियंत्रक अधिकारी/ आहरण व संवितरण अधिकारी, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई ३२
३२. निवड नस्ती (कार्यासन ई-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.